**महाराष्ट्र विकास सेवा गट-अ व गट-ब**
**( राजपत्रित ) अधिकाऱ्यांच्या पदस्थापना ,**
**बदली याबाबत सक्षम प्राधिकाऱ्यास शिफारशी**
**करण्यासाठी नागरी सेवा मंडळ -१ ची**
**पुनर्रचना करणेबाबत**

# महाराष्ट्र शासन
## ग्राम विकास विभाग
## शासन निर्णय क्रमांक:मविसे-१०२२/प्र.क्र.४१/२०२२/आस्था-३अ

बांधकाम भवन, २५, मर्झबान पथ, मुंबई - ४०० ००१
तारीख: २५ मार्च,२०२२.

**संदर्भ:-**

१) मा.सर्वोच्च न्यायालयाने रिट पिटीशन (सिव्हील)क्र.८२/२०११ मध्ये दिनांक ३१.१०.२०१३ रोजी दिलेला निर्णय.
२) महाराष्ट्र शासकीय कर्मचाऱ्यांच्या बदल्यांचे विनियमन आणि शासकीय कर्तव्ये पार पाडताना होणाऱ्या विलंबास प्रतिबंध अधिनियम, २००५ .
३) शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग, क्र.एसआरव्ही-२०१४/प्र.क्र.२६/१२, दिनांक ३१.१.२०१४.
४) शासन निर्णय, ग्रामविकास विभाग, क्रमांक:मविसे-१०१४/प्र.क्र.४६/२०१४/आस्था-३, दिनांक ३० जून,२०२०.
५) शासन निर्णय, ग्रामविकास विभाग, क्रमांक:मविसे-१०२१/प्र.क्र.५६/२०२१/आस्था-३अ, दिनांक १२ ऑगस्ट,२०२१.

**प्रस्तावना :**

मा.सर्वोच्च न्यायालयाने संदर्भाधीन क्र.१ नुसार दिलेल्या निर्देशाचे पालन करण्यासाठी राज्य शासनाने संदर्भाधीन क्र.३ अन्वये घेतलेल्या निर्णयानुसार ग्राम विकास विभागाच्या नियंत्रणाखालील महाराष्ट्र विकास सेवा गट-अ व गट-ब (राजपत्रित) संवर्गातील अधिकाऱ्यांच्या पदस्थापना, बदली याबाबत सक्षम प्राधिकाऱ्यास शिफारशी करण्यासाठी नागरी सेवा मंडळ (१) ची पुनर्रचना संदर्भ क्र.४ व ५ येथील शासन निर्णयान्वये करण्यात आली आहे. संदर्भ क्र.४ व ५ येथील शासन निर्णय अधिक्रमित करून नागरी सेवा मंडळ(१) ची पुनर्रचना करणे शासनाच्या विचाराधीन होते.

**शासन निर्णय:-**

ग्रामविकास विभागाच्या नियंत्रणाखालील महाराष्ट्र विकास सेवा, गट-अ व गट-ब (राजपत्रित) संवर्गातील अधिकाऱ्यांच्या बदली व पदस्थापना याबाबत सक्षम प्राधिकाऱ्यास शिफारशी करण्यासाठी संदर्भ क्र.४ व ५ येथील शासन निर्णय अधिक्रमित करून खालीलप्रमाणे नागरी सेवा मंडळ (१) ची पुनर्रचना करण्यात येत आहे :

| | | |
|---|---|---|
| १ | अतिरिक्त मुख्य सचिव/प्रधान सचिव/सचिव ( ग्रामविकास विभाग ) | अध्यक्ष |
| २ | उप सचिव ( आस्थापना-१ ), ग्रामविकास विभाग. | सदस्य |
| ३ | सह / उप सचिव (आस्थापना), आदिवासी विकास विभाग. | सदस्य |

उक्त प्रमाणे नागरी सेवा मंडळ (१) सदर शासन निर्णयाच्या दिनांकापासून अस्तित्वात येणार असून:

१) महाराष्ट्र विकास सेवा, गट-अ व गट-ब (राजपत्रित) पदांवर पदोन्नतीने / सरळसेवेने नियुक्तीसाठी शासन तरतूदींनुसार विभागीय संवर्ग वाटप अंतिम केल्यावर त्या यादीतील अधिकाऱ्यांच्या पदस्थापनेचा प्रस्ताव नागरी सेवा मंडळासमोर शिफारशींसाठी ठेवावा.

२) बदल्यांबाबत शिफारशींसाठी प्रस्ताव, नागरी सेवा मंडळासमोर ठेवताना, महाराष्ट्र शासकीय कर्मचाऱ्यांच्या बदल्यांचे विनियमन अधिनियम , २००५ मधील तरतूदीनुसार कार्यवाहीबाबत वस्तुस्थिती तसेच प्रस्तावित बदल्यांबाबतची पार्श्वभूमी/वस्तुस्थिती, नागरी सेवा मंडळाच्या निदर्शनास आणणे आवश्यक राहील.

३) पदस्थापनेसाठीच्या प्रस्तावावर, नागरी सेवा मंडळाकडून शिफारस झाल्यावर, शिफारशीनुसार प्रस्ताव सक्षम प्राधिकाऱ्यास मान्यतेसाठी सादर करावा. त्यावर अंतिम निर्णय सक्षम प्राधिकाऱ्याकडून घेण्यात येईल.

४) बदलीसाठीच्या प्रस्तावावर, नागरी सेवा मंडळाकडून शिफारस झाल्यावर प्रस्ताव शासकीय कर्मचाऱ्यांच्या बदल्यांचे विनियमन अधिनियमातील तरतूदींनुसार उचित सक्षम प्राधिकाऱ्यास मान्यतेसाठी सादर करावा. त्यावर अंतिम निर्णय संबंधित प्राधिकाऱ्याकडून घेण्यात येईल.

५) बदल्यांसंबंधीच्या प्रस्तावावर, महाराष्ट्र शासकीय कर्मचाऱ्यांच्या बदल्यांचे विनियमन अधिनियम, २००५ मधील तरतूदींनुसार कार्यवाही करणे बंधनकारक राहील.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२२०३२५१६०३०४८३२० असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

SANJAY RAJARAM PAWAR

Digitally signed by SANJAY RAJARAM PAWAR
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=RURAL DEVELOPMENT DEPARTMENT, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=9300c64809bdf96f4ab55761f66ae1eae5d7703062b0e368c4366203d8b9ac9f, pseudonym=6C6A617E06F1CEEBB5DED3DCD864C5C838455063, serialNumber=65AFD54F6450AB9DA3327C361BFC1F5F92E629B78ED9A49381D3C9751F71254A, cn=SANJAY RAJARAM PAWAR
Date: 2022.03.28 11:27:45 +05'30'

**(संजय पवार)**
अवर सचिव,महाराष्ट्र शासन

प्रत,

१. मा.राज्यपाल यांचे प्रधान सचिव , राजभवन , मलबार हिल , मुंबई .
२. मा. मुख्यमंत्री यांचे अपर मुख्य सचिव.
३. मा. उप मुख्यमंत्री यांचे खाजगी सचिव.
४. मा. मंत्री आणि मा. राज्यमंत्री ( सर्व ) यांचे खाजगी सचिव / स्वीय सहायक
५. मा.विरोधी पक्षनेता, विधान परिषद/विधानसभा, विधान भवन , मुंबई
६. मा.सर्व संसद सदस्य/विधानमंडळ सदस्य, महाराष्ट्र राज्य

७. मा.मुख्य सचिव, महाराष्ट्र राज्य
८. सर्व मंत्रालयीन विभागाचे अपर मुख्य सचिव / प्रधान सचिव / सचिव
९. महालेखापाल, महाराष्ट्र -१ / २ ( लेखा व अनुज्ञेयता / लेखा परीक्षा ), मुंबई / नागपूर
१०. विभागीय आयुक्त ( सर्व )
११. मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद ( सर्व ) ,
१२. वित्त विभाग (अर्थसंकल्प-३/वित्तीय सुधारणा/सेवा-९/व्यय-१५)मंत्रालय , मुंबई
१३. सामान्य प्रशासन विभाग ( कार्या -१० / कार्या -१२ / कार्या -१६ ब ) , मंत्रालय , मुंबई
१४. सर्व मंत्रालयीन विभाग
१५. ग्रामविकास विभागातील सर्व कार्यासने
१६. निवड नस्ती ( कार्यासन आस्था -३ अ) .